"तहसिलदार, ता.येवला, जि.नाशिक यांच्या नावे स्वीय प्रपंजी लेखा खाते (पी.एल.ए.) उघडण्यास मान्यता देण्याबाबत"

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१७९/ज-१अ**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २० ऑगस्ट, २०१८.

**संदर्भ** :- जिल्हाधिकारी कार्यालय, नाशिक (कुळ कायदा शाखा) यांचे क्र.कक्ष-४/ कुका-३/कावी/६१३/१७, दिनांक २१/८/२०१७

**प्रस्तावना :-**

उपकोषागार, येवला अधिनस्त ALT/PLA कोड नं.८२२४ हा ठेवलेखा बंद केलेला आहे. तहसिलदार, येवला यांच्याकडे कुळकायद्याअंतर्गत केसेस चालू असल्याने सदरील ठेव लेख्यामध्ये व्यवहार करणे आवश्यक होते. यास्तव, सदर ठेवलेखा सुरु करण्याकरिता, तहसिलदार, येवला, जिल्हा नाशिक यांच्या नावाने नवीन स्वतंत्र स्वीय प्रपंजी लेखा खाते उघडण्याबाबतचा विहित नमुन्यातील प्रस्ताव वित्त विभागाकडे सादर करण्यात आला होता. त्यास वित्त विभागाने मान्यता दिली आहे. तद्नंतर, महालेखापाल, नागपूर यांच्याकडे तहसिलदार, येवला, जिल्हा नाशिक यांच्या नावे स्वीय प्रपंजी खाते उघडण्यास मान्यता देण्यासाठी प्रस्ताव पाठविण्यात आला होता. त्यास महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-II, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी दिलेल्या सहमतीस अनुलक्षून आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-II, महाराष्ट्र, नागपूर कार्यालयाने दिलेल्या सहमतीनुसार, तहसिलदार, येवला, जिल्हा नाशिक यांच्या नावे स्वीय प्रपंजी खाते (Personal Ledger Account) उघडण्यास, महाराष्ट्र कोषागार नियम,१९६८ (खंड-I) मधील नियम ४९४ व ४९५ च्या तरतुदी अन्वये प्राप्त अधिकारात खालील अटींच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे :-

1. Amounts in respect of tenancy land, taken from tenants shall be deposited Compulsorily to this Personal Ledger Account.
2. Amounts shall be withdrawn from PLA only for payment to Landlords towards tenancy land.
3. (a) All cheques on or after 1st January each year should be routed through Treasury Officer.
   (b) As per revised provision of Rule 495, if the Personal Ledger Account is not operated for more than one complete Accounting year, it shall be closed by Treasury Officer without waiting for proposal from Administrator.
4. The Administrator shall be responsible for reconciliation with Treasury / Sub treasury.

5. All provision of Accounting Rules for Treasuries 1992 and all provisions of PLA in view of MTR 1968 Vol.I shall apply to this PLA.
6. The PLA shall be subject to Audit as per rule.

७. उपकोषागार, येवला, नाशिक यांच्या अधिनस्त स्वीय प्रपंजी लेखा खात्यात वेळोवेळी आर्थिक व्यवहार होणे आवश्यक आहे. तसेच सदर लेखा खाते बंद पडणार नाही याची दक्षता संबंधित कार्यालयाने घ्यावी.

८. सदर लेखा खात्याच्या व्यवहारांचे ताळमेळ (reconciliation) व परिक्षण याची सर्वस्वी जबाबदारी संबंधित कार्यालयाची राहील.

९. तसेच,उपकोषागार, येवला, नाशिक यांच्या अधिनस्त स्वीय प्रपंजी लेखा खात्यामध्ये अखर्चित रक्कम असल्यास, जिल्हाधिकारी नाशिक यांनी शासनाकडे प्रथमत: वर्ग करणे अनिवार्य राहील.

१०. एकत्रित निधीत खर्च घालून काही कारणासाठी शासन मान्यतेने स्वीय प्रपंजी लेख्यामध्ये रक्कम जमा करण्यात आली तर महाराष्ट्र कोषागार नियम,१९६८ (खंड-I) मधील नियम क्र.४९५ अनुसार आर्थिक वर्षअखेरीस त्यापैकी शिल्लक रक्कम पुन्हा लेखाशीर्षात वर्ग करणे बंधनकारक राहिल. सदर रक्कम पुढील आर्थिक वर्षात वापरण्यास प्रतिबंध करण्याबाबत सूचना देण्यात येत आहेत.

११. सदर लेख्याचे खातेपुस्तक दरमहा उपकोषागाराकडे पाठवावे. आर्थिक वर्ष संपताच वर्षाअखेर स्वीय प्रपंजी लेख्यामध्ये शिल्लक असलेल्या रकमेचे शिल्लक प्रमाणपत्र अधिकाऱ्यांकडे पाठवावे. खातेपुस्तक सलग ३ महिने उपकोषागाराकडे न पाठविल्यास किंवा आर्थिक वर्ष संपताच पुढील ३१ मे च्या आत शिल्लक रकमेचे प्रमाणपत्र न पाठविल्यास सदर कार्यवाही पूर्ण होईपर्यंत कोषागाराकडून पुढील प्रदाने केली जाणार नाहीत.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.अनौसं २६११/८/कोषा -५, दि.११/५/२०१८ व महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-II, नागपूर यांच्या क्र. टीएम/जीआर.II/पीएलए/ता/युओआर-२/२०१८-१९/६५९, दि.१९/६/२०१८ च्या अनौपचारिक संदर्भान्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१८०८२०१५१३३०६३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sunil Shridhar Kothekar

Digitally signed by Sunil Shridhar Kothekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a4e83b3f4c3a086b626255c2b2cb37acdeb67b59b5e9ecbb4d25b60ccef2c660, cn=Sunil Shridhar Kothekar
Date: 2018.08.20 15:16:12 +05'30'

**( सुनिल कोठेकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. विभागीय आयुक्त, नाशिक,

२. जिल्हाधिकारी, नाशिक,
३. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - I, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-II, महाराष्ट्र राज्य, नागपूर,
५. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
६. सह सचिव (ज-१-अ), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. कार्यासन ज-६, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. तहसिलदार, ता.येवला, जि.नाशिक,
९. कोषागार अधिकारी/उपकोषागार अधिकारी, ता.येवला, जि.नाशिक
१०. वित्त विभाग (कार्यासन कोषा-५),मंत्रालय, मुंबई,
११. निवड नस्ती (ज-१-अ).